नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग नकाशे / झोन नकाशे पुरविण्यासाठी आकारावयाचे सुधारित दर.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-५०१९/प्र.क्र.११४/२०१९/नवि-२७**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

**दिनांक :- २८ ऑक्टोबर, २०२०**

वाचा:- १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.टीपीव्ही-१६८४/१०८४/सीआर-१२६/युडी-६, दि.२७.०६.१९८४.

२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.टीपीव्ही-२३९०/४७५/प्र.क्र.१०३/१९९९/नवि-२७, दि.०७.०२.२०००.

३) नगर रचना आणि मूल्यनिर्धारण विभाग, पुणे यांचे पत्र क्र.संनर/झोन-भाग नकाशे/ रेखाकला/टिपीव्ही-२/५९०, दि.०६.०२.२०२०.

**शासन निर्णय :-**

नगर रचना व मुल्यनिर्धारण संचालनालयाकडून शहर विकास योजना व नगर रचना योजना इत्यादिचे भाग नकाशे, सनदा जनतेस व शासकीय कार्यालयांना (राज्य शासकीय कार्यालये वगळून) संदर्भीय क्र.१ येथील दि.२७.०६.१९८४ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या दराप्रमाणे पुरविल्या जात होत्या.

२. तद्नंतर नगर रचना व मुल्यनिर्धारण संचालनालयाकडून शहर विकास योजना व नगर रचना इत्यादीचे भाग नकाशे / सनदा तयार करण्यासाठी लागणाऱ्या कागदाच्या किंमतीतील वाढ कर्मचाऱ्यांचे वेतन इत्यादीमध्ये झालेली वाढ लक्षात घेता, संदर्भीय क्र.२ येथील दि.०७.०२.२००० च्या शासन निर्णयान्वये सदर सुधारित दर पुढील तीन वर्षासाठी सुधारित केले होते.

३. आता, नगर रचना संचालनालयाच्या अखत्यारितील सर्व जिल्ह्यातील संबंधित शाखा कार्यालयाकडून मंजूर प्रादेशिक योजनेनुसार व विकास योजनेनुसार नागरिकांना / हितसंबंधितांना भाग नकाशे / झोन नकाशे तयार करण्यासाठी लागणाऱ्या कागदाच्या किंमतीतील वाढ कर्मचाऱ्यांचे वेतन इत्यादीमध्ये वाढ झाल्यामुळे दरात वाढ करण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता. शासन आता सोबत जोडलेल्या विवरणपत्रामध्ये नमूद केल्याप्रमाणे (अ) भाग नकाशे / झोन दाखले Offline पध्दतीने जनतेला उपलब्ध करुन देण्याकरीता व (ब) भाग नकाशे / झोन दाखले Online पध्दतीने जनतेला उपलब्ध करुन देण्याकरीता सुधारित दरास पुढील तीन वर्षासाठी किंवा तत्पुर्वी जरुर वाटल्यास सुधारित करण्याच्या अटीवर मान्यता देत आहे.

४. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८५/व्यय-३, दि.१५.०५.२०२० अन्वये त्यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक **२०२०१०२८११०६४८०५२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.10.28 16:23:09 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत : विवरणपत्र "अ"**

**प्रति,**

१. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सहसंचालक, नगर रचना अंमलबजावधी कक्ष, पुणे.
३. सहसंचालक, नगर रचना (नोंदणी शुल्क), पुणे.
४. सर्व उपसंचालक, नगर रचना.
५. सर्व सहायक संचालक, नगर रचना.
६. सर्व लवाद नगर रचना योजना.
७. सर्व नगर रचनाकार,
८. महालेखाकार-१ महाराष्ट्र मुंबई (३ प्रती)
९. महालेखाकार-२ महाराष्ट्र नागपूर (३ प्रति)
१०. वित्त विभाग / व्यय-३, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती / नवि-२७.

***

## विवरणपत्र "अ"

## शासन निर्णय क्र.संकीर्ण-५०१९/प्र.क्र.११४/२०१९/नवि-२७, दि.२८.१०.२०२० सोबतचे विवरणपत्र.

**(अ)** भाग नकाशे / झोन दाखले Offline देण्याकरीता शुल्क दर्शविणारा तक्ता:-

| अ.क्र. | नकाशा / दाखला तपशिल | विद्यमान दर (रुपयांत) | | सुधारित दर (रुपयांत) (Color प्रत) |
|---|---|---|---|---|
| | | Black & White प्रत | Color प्रत | |
| १ | नकाशा पूर्ण आकार २० X ३० सें.मी. (A४-SIZE) | ३० | ६० | **७००** |
| २ | नकाशा ३० X ४५ सें.मी. (A३-SIZE) | ४० | ८० | **११००** |
| ३ | नकाशा ४५ X ६० सें.मी. (A२-SIZE) | ५० | १०० | **१५००** |
| ४ | नकाशा ६० X ९० सें.मी. (A१-SIZE) | ६० | १२० | **२५००** |
| ५ | नकाशा ७५ X १०५ सें.मी. (A०-SIZE) | ८० | १६० | **६८००** |
| ६ | नगर रचना योजनेतील एक अंतिम व त्याचा मूळ भूखंड दर्शविणारा भाग नकाशा | - | ५० | **७००** |
| ७ | नगर रचना योजनेतील दोन अंतिम भूखंड व त्यांच्या मूळ भूखंडाचा भाग नकाशा | - | ८० | **१५००** |
| ८ | दोन पेक्षा अधिक अंतिम भूखंड व त्यांच्या मूळ भूखंडाचा भाग नकाशा | - | १४० | **२५००** |
| ९ | मंजूर नगर रचना योजनेतील अंतिम भूखंडाच्या सनदेच्या प्रथम प्रतीसाठी | - | ५० | **३०००** |
| १० | मंजूर नगर रचना योजनेतील अंतिम भूखंडाच्या सनदेच्या दुसऱ्या प्रतीसाठी | - | ४० | **८००** |
| ११ | मंजूर नगर रचना योजनेच्या योजना पुस्तकामधील एका अंतिम भूखंडाच्या नोंदीच्या उताऱ्यासाठी | - | ३० | **२००** |
| १२ | मंजूर विकास योजना / प्रादेशिक योजनेमधील एक स.नं./ गट नं. च्या प्रमाणपत्राच्या एका प्रतीसाठी | - | ३० | **३००** |
| १३ | विकास योजना नकाशे, भाग नकाशे यांची सीडी पुरविणे (१ जी. बी. पर्यंत सीडी साठी) | - | - | **५००** |
| १४ | मंजूर रेखाकन / बांधकाम नकाशाच्या सत्यप्रती व आदेशाची (शिफारस) प्रत. | - | - | पत्राचे (आदेशाचे) रु. **५/-** प्रती पान<br>A-४ रु.५०/-<br>A-३ रु.१००/-<br>A-२ रु.१५०/-<br>A-१ रु.२००/-<br>(नकाशा) |

**(ब)** भाग नकाशे / झोन दाखले Online देण्याकरीता शुल्क :- नगर संचालनालयाच्या विविध कार्यालयाकडून A-४ आकाराचे भाग नकाशे Online पध्दतीने उपलब्ध होण्यासाठी रु.२५०/- प्रति सर्व्हे नंबर.

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
Date: 2020.10.28 16:23:29 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

----------x----------